**आदिवासींच्या जमिनीचे बिगर आदिवासींना होणारे हस्तांतरण रोखण्यासाठी इतर राज्यात अस्तित्वात असलेल्या कायद्यांची तपासणी करण्यासाठी ३ अभ्यासगटांची स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जजाप-२०१४/प्र.क्र.७७/का-१४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: २७ ऑगस्ट, २०१४.

**वाचा-**

१. शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्र.जजाप-२०१४/प्र.क्र.२०/कार्या-०७, दिनांक १५/०४/२०१४ व दिनांक २२/०५/२०१४.

२. शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्रमांक जजाप-२०१४/प्र.क्र.७७/कार्या-१४, दिनांक ११/०६/२०१४.

**प्रस्तावना-**

जनजाती सल्लागार परिषदेच्या ४८ व्या बैठकीमध्ये झालेल्या ठरावानुसार आदिवासींच्या जमिनीचे बिगर आदिवासींना होणारे हस्तांतरण रोखण्यासाठी इतर राज्यात अस्तित्वात असलेल्या अशा कायद्यांची तपासणी करुन महाराष्ट्र जमीन महसूल कायदा, १९६६ मध्ये योग्य बदल करण्यासाठी शिफारशी सुचविण्याकरिता संदर्भ कमांक २ अन्वये अपर मुख्य सचिव, (महसूल) यांचे अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली आहे.

या संदर्भात अपर मुख्य सचिव (महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली सदर समितीच्या दिनांक ०१/०७/२०१४ रोजी झालेल्या १ ल्या बैठकीतील चर्चेनुसार ४ राज्यातील ( आंध्र प्रदेश, छत्तीसगढ, ओडीसा व मध्य प्रदेश ) अस्तित्वात असलेल्या जमीन महसूल कायदा तपासणी करण्यासाठी ३ स्वतंत्र अभ्यासगट निर्माण करुन त्यांनी वरील ४ राज्याचा दौरा आयोजित करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

आदिवासींच्या जमिनीचे बिगर आदिवासींना होणारे हस्तांतरण रोखण्यासाठी इतर राज्यात अस्तित्वात असलेल्या जमीन महसूल कायदा अधिनियमात काय तरतूदी आहेत याचा तुलनात्मक अभ्यास करण्यासाठी ३ स्वतंत्र अभ्यासगट अनुकमे जिल्हाधिकारी, ठाणे, नंदुरबार व मा. राज्यपाल कार्यालयातील उप सचिव यांच्या नियत्रंणाखाली स्थापन करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. सदर अभ्यासगटामध्ये वर नमूद केलेल्या २ जिल्हाधिकारी व उप सचिव यांचे व्यतिरिक्त महसूल विभाग / आदिवासी विकास विभाग / विधी व न्याय विभागातील वा क्षेत्रीय कार्यालयातील अन्य उपयुक्त अशा आणखी २ सदस्यांचा समावेश आवश्यकतेनुसार संबंधित अभ्यासगट प्रमुखांनी करावा.

सदर अभ्यासगट आदिवासींच्या जमिनीचे बिगर आदिवासींना होणारे हस्तांतरण रोखण्यासाठी इतर राज्यात अस्तित्वात असलेल्या या संदर्भातील कायद्यांची व प्रशासकीय व्यवस्थेची तपासणी करेल तसेच प्रत्यक्षात होत असलेल्या अंमलबजावणीबाबत व या कायदेशीर तरतुदींमुळे झालेल्या अनुकूल / प्रतिकूल परिणामांबाबत सविस्तर अहवाल सादर करेल.

सदर अभ्यासगटाने वर नमूद ४ राज्यांचा अभ्यासदौरा त्वरीत आयोजित करुन या संदर्भातील अहवाल एक महिन्याच्या आत सादर करावा.

सदर अभ्यासगटातील सदस्यांना विद्यमान शासकीय दराने प्रवास व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील व या प्रयोजनावरील खर्च आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे या आस्थापनेव्दारे खर्ची घालण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०८२७१२२२३८१९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandharkame Nitin A

Digitally signed by Pandharkame Nitin A
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=MTD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pandharkame Nitin A
Date: 2014.08.28 11:39:15 +05'30'

**( नि. अ. पांढरकामे )**
**अवर सचिव**

**प्रत,**

१ मा.राज्यपाल यांचे सचिव
२ मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३ मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४ मा.मंत्री, (महसूल) यांचे खाजगी सचिव
५ मा.मंत्री, (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
६ मा.राज्यमंत्री, ( महसूल) यांचे खाजगी सचिव
७ मा.राज्यमंत्री, (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव
८ मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
९ मा.अपर मुख्य सचिव, (महसूल), मंत्रालय, मुंबई
१० मा.प्रधान सचिव (आदिवासी विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
११ मा.प्रधान सचिव (विधी व न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई
१२ आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
१३ आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१४ सर्व विभागीय आयुक्त
१५ जिल्हाधिकारी, ठाणे / नंदुरबार.
१६ सर्व सह सचिव / उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७ कक्ष अधिकारी (कार्या-०७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८ कक्ष अधिकारी (ल-९ कार्यासन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९ निवड नस्ती (कार्या-१४), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.